**<u>केंद्र पुरस्कृत योजना सन २०१९-२०</u>**
**"व्याघ्र प्रकल्प" योजनेअंतर्गत नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्पाकरीता निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१९/प्र. क्र. २१०/भाग-१/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २० मार्च, २०२०.

<u>वाचा :-</u>

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक :- ०१.०४.२०१८.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक :- ०८.०७.२०१९.
३. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१(४४)/२०१९-पीटी, दिनांक :- ०९.०७.२०१९.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०७.१९/प्र. क्र. २१०/फ-१, दिनांक ०६.०८.२०१९.
५. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१(४४)/२०१९-पीटी, दिनांक :- १९.०२.२०२०.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१३/NNTR/१८६५/१९-२०, दिनांक ०५.०३.२०२०.

<u>प्रस्तावना :-</u>

१. सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-"व्याघ्र प्रकल्प" अंतर्गत नवेगवा-नागझिरा व्याघ्र प्रकल्पाकरीता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये (सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना) अंतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता रु. १६६०.९३ लक्षचे कार्यबाबींस मंजूरी प्रदान केली असून प्रथम हप्ता म्हणून रु. ७४५.७५ लक्ष (सन २०१८-२०१९ मधील अखर्चीत रक्कम रु. ७६.२४ लक्ष धरुन) निधी वितरित केला असून त्या अनुसरून राज्य शासनाचा हिस्सा रु. ५८२.९९ लक्ष असे एकूण रुपये १३२८.७४ लक्ष निधी प्रथम हप्ता म्हणून वितरित करणे अपेक्षित होते. तथापि, राज्य शासनाकडे **अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना** घटकाच्या अनावर्ती + आवर्ती बाबींकरीता स्वतंत्री लेखाशिर्ष उपलब्ध नसल्याने संदर्भ क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये सर्वसाधारण घटकाच्या अनावर्ती + आवर्ती कार्यबाबीकरीता रु. १०७३.६० लक्ष निधी वितरित करण्यात आला आहे.

२. आता केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांन संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये सर्वसाधारण घटकांतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता केंद्र हिस्साच्या दुसरा हप्ता रु. १५०.०० लक्ष निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्या अनुरुप सर्वसाधारण घटकांतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता राज्य हिस्साच्या दुसरा हप्ता रु. ११७.२६ लक्ष निधी असे एकुण २६७.२६ लक्ष निधी वितरित करणे आवश्यक आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

सबब आता सदर शासन निर्णयान्वये **रु. २६७.२६ लक्ष** निधी संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) व्याघ्र प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठी होणारा खर्च **I)** अनावर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ६०% करीता रु. ९८.२२ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०४) व्याघ्र प्रकल्प (६० % केंद्रीय अनुदान) (२४०६ १२४३) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. ६५.४८ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१०२) **III)** आवर्ती बाबींसाठी रु. ५१.७८ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(२३) व्याघ्र प्रकल्प (५० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ए१२२) **IV)** त्या अनुरुप ५० % राज्य हिस्सा रु. ५१.७८ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२४) व्याघ्र प्रकल्प (५० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१३१) सन २०१९-२०२० मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्र क्र. ३ अन्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक :- ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०१४५९०२०७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2020.03.20 15:03:22 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
५. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).